"धर्मादाय आयुक्त, राजपत्रित अधिकारी संघटना" या संघटनेस महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम क्र.२९ अंतर्गत शासन मान्यता देण्याबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन निर्णय क्र. संघटना १५१७/प्र.क्र. १३/१६-अ,**
मादाम कामा मार्ग, राजगुरु हुतात्मा चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ३ मार्च, २०१७

**वाचा:-**

१. धर्मादाय आयुक्त, महाराष्ट्र राज्य यांचे पत्र क्रमांक आस्था/लेखा-१/७४८७/१५, दिनांक १७.१२.२०१५
२. सरचिटणीस, धर्मादाय आयुक्त राजपत्रित अधिकारी संघटना ( नियोजित ) यांचे पत्र दिनांक २१.६.२०१६
३. सामान्य प्रशासन विभाग,शासन परिपत्रक क्रमांक आरजीए-१०८४/सीआर-९९/१६-अ, दिनांक १०.१२.१९८४ व शा.प.क्रमांक संघटना १५१४/प्र.क्र.२५६/१६-अ, दिनांक २७.३.२०१५
४. सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्रमांक संघटना १५१४/प्र.क्र.२५०/१६-अ, दिनांक १८.३.२०१५

**प्रस्तावना:-**

शासकीय कर्मचा-यांच्या (औद्योगिकेत्तर) संघटनांना महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ च्या नियम २९, नियम ३० व सदर नियमावलीच्या परिशिष्ट, अनुसूची एक व अनुसूची दोन मध्ये विहित केलेल्या अटी व शर्ती तसेच "नवीन आदर्श नियम" ची घटना व नियमांच्या अधीन राहून शासन मान्यता देण्यात येते. त्याकरिता अनुसरावयाची कार्यपध्दती संदर्भांकित ४ येथील शासन परिपत्रक दिनांक १८.३.२०१५ अन्वये विहित करण्यात आली आहे.

धर्मादाय आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे कार्यालयाकडून दिनांक १७.१२.२०१५ व दि.१२.७.२०१६ च्या पत्रासोबत धर्मादाय आयुक्त राजपत्रित अधिकारी संघटना (नियोजित) (ज्याचा यापुढे “सदर संघटना” असा उल्लेख केला आहे) या संघटनेच्या विहित नमुन्यातील अर्जान्वये "धर्मादाय आयुक्त राजपत्रित अधिकारी संघटना" यास शासन मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे.

त्यानुसार "धर्मादाय आयुक्त राजपत्रित अधिकारी संघटना" या संघटनेस महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ च्या नियम २९ व ३० मधील तरतूदी अंतर्गत मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुसरुन पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे:-

**शासन निर्णय:-**

"धर्मादाय आयुक्त राजपत्रित अधिकारी संघटना" या शासकीय कर्मचा-यांच्या (औद्योगिकेतर) संघटनेस महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ नियम क्रमांक २९ व ३० तसेच अनुसूची दोन येथील “नवीन आदर्श नियमावली”तील नियम क्रमांक १ ते २९ मधील अटी व शर्तींच्या अधीन राहून तसेच, खाली विहित केलेल्या अतिरिक्त अटी व शर्तींच्या अधीन राहून शासनाची मान्यता देण्यात येत आहे:-

१. सदर संघटना ही विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई ३२ यांच्या प्रशासकीय अधिपत्याखाली असेल.

२. विधी व न्याय विभागाचे सचिव व विधी व परामर्शी हे सदर संघटनेच्या दफ्तर तपासणी, निवडणूका व निवडणूकीसंदर्भात उदभवणारे वाद, न्यायालयीन प्रकरणे इत्यादी बाबतीत सक्षम

अधिकारी राहतील. तसेच ते आपल्या अधिपत्याखालील अधिका-यास (जो उप सचिवांचे हुद्याच्या अधिका-यांपेक्षा कनिष्ठ नाही) या कार्यासाठी नामनिर्देशीत करु शकतील.

३. ज्या वर्गाचे प्रतिनिधित्व सदर संघटना करते त्या वर्गातील शासकीय कर्मचा-यांच्या एकूण संख्येपैकी २५ टक्के पेक्षा कमी नाही एवढे कर्मचारी या संघटनेचे सदस्य असावेत.

४. सदर संघटना कोणत्याही राजकीय पक्षाशी किंवा राजकीय संघटनेशी संबंधीत किंवा राजकीय चळवळीमध्ये गुंतलेली नसावी.

५. सदर संघटना सदस्यांच्या वतीने कोणतेही प्रचारात्मक किंवा प्रक्षोभक साहित्य, वृत्तपत्रातून किंवा अन्यथा प्रकाशित करणार नाही किंवा प्रकाशित करण्यास अनुमती देणार नाही.

६. सदर संघटनेचे कार्यवृत्त-पुस्तक, सदस्यांची नोंदवही, लेखा पुस्तके आणि प्रमाणके आणि इतर सर्व कागदपत्रे, यासंबंधात शासनाने प्राधिकृत केले असेल अशा कोणत्याही अधिका-यांना तपासणीसाठी खुली ठेवील.

७. सदर संघटनेने, शासन यासंबंधात प्राधिकृत करील, अशा अधिका-याने आवश्यक म्हणून ठरवून दिलेल्या तारखेपर्यंत संबंधित विभागाच्या सचिवांना आपल्या सदस्यांचे वार्षिक विवरणपत्र आणि लेखापरीक्षित लेख्यांची प्रत सादर केली पाहिजे.

८. "धर्मादाय आयुक्त राजपत्रित अधिकारी संघटना" यांनी महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम,१९७९ मधील नियम क्रमांक २९ व ३० मधील विहित अटी व शर्ती तसेच उपरोक्त नमूद अट क्रमांक ३ ते ६ चे उल्लंघन केल्यास संघटनेची मान्यता रदद करण्यात येईल.

२. सदर संघटनेमार्फत उपरोक्त विहीत अटींचे योग्य प्रकारे पालन करण्यात येत आहे, याबाबत विधी व न्याय विभागाने खातरजमा करावी व याकरिता शासन परिपत्रक क्र.आरजीए-१०८४/सीआर-९९/१६-अ, दिनांक १० डिसेंबर, १९८४ तसेच शासन परिपत्रक क्रमांक संघटना १५१४/प्र.क्र.२५६/१६-अ, दिनांक २७.३.२०१५ मध्ये नमूद सूचनेनुसार आवश्यक ती कार्यवाही करावी.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०३०३१६०१४८९८०७ आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anuradha K. Khanvilkar

Digitally signed by Anuradha K. Khanvilkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e2fed57d20a51362449278a4aa952427fd085043a65380ece8ec8bac6c4d7d01, cn=Anuradha K. Khanvilkar
Date: 2017.03.03 17:07:27 +05'30'

**(अनुराधा खानविलकर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. माविरोधी पक्षनेता., विधान सभा/ विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.०३२ ४००-

२. सर्व सन्माननीय महाराष्ट्र विधानसभा विधानपरिषद व/राज्यातील संसद सदस्य, महाराष्ट्र राज्य .

३. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई .०३५ ४००-

४. मा. मुख्यमंत्र्यांचे सचिव, मुख्यमंत्री सचिवालय , मंत्रालय, मुंबई.०३२ ४००-

५. सर्व मा. मंत्री / मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
६. मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७. शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव.
८. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधान सभा), विधानभवन, मुंबई.
९. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधान परिषद), विधानभवन, मुंबई.
१०. सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई- ४०० ०३२.
११. सचिव, राज्य माहिती आयोग, मुंबई-४०० ०३२.
१२. प्रबंधक, उच्च न्यायालय, (मूळ न्याय शाखा), मुंबई, औरंगाबाद, नागपूर.
१३. प्रबंधक, उच्च न्यायालय, (अपिल शाखा), मुंबई, औरंगाबाद, नागपूर.
१४. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई, औरंगाबाद, नागपूर.
१५. प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त, मुंबई.
१६. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
१७. महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-१, मुंबई.
१८. महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-२, नागपूर.
१९. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ (५ प्रती).

**त्यांना विनंती की, प्रस्तुत शासन निर्णय प्रसिध्द करण्यात यावा.**

२०. सर्व महानगरपालिकांचे आयुक्त.
२१. सर्व जिल्हाधिकारी, महाराष्ट्र राज्य
२२. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
२३. सर्व मुख्याधिकारी, नगरपरिषदा/नगरपालिका.
२४. विधीमंडळ ग्रंथालय, विधानभवन, मुंबई (१० प्रती),
२५. सर्व मान्यताप्राप्त राजकीय पक्षांची मध्यवर्ती कार्यालये.
२६. राज्यातील सर्व महामंडळे , मंडळे आणि सार्वजनिक उपक्रम यांचे व्यवस्थापकीय संचालक.
२७. उप सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२. (घटनेच्या व शपथपत्राच्या प्रतींसह)
२८. श्रीमती सुवर्णा खंडेलवाल-जोशी, सरचिटणीस, धर्मादाय आयुक्त राजपत्रित अधिकारी संघटना, धर्मादाय आयुक्त भवन, दुसरा मजला, बिल्डिंग क्र.८३, डॉ.ॲनी बेझंट रोड, वरळी, मुंबई ४०० ०१८ (घटनेच्या व शपथपत्राच्या प्रतींसह)
२९. निवड नस्ती- कार्यासन १६-अ.